राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ. भोरटेक (ता. मोताळा, जि. बुलडाणा ) ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१८/प्र.क्र.२८८/पापु-१३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३० जानेवारी, २०१९

**वाचा**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा यांचे पत्र क्रमांक: बुजिप/ग्रापापुवि/३६२९/२०१८, दिनांक २६ डिसेंबर, २०१८
२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३
४) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७, दिनांक २२ जानेवारी, २०१४
५) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै, २०१४
६) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४
७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फ़ेब्रुवारी, २०१५
८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २० फ़ेब्रुवारी, २०१५
९) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १० मार्च, २०१५
१०) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
११) शासन परिपत्रक क्रमांक: मुपेयो २०१७/प्र.क्र.१८६/पापु-१९, दिनांक ०६ ऑगस्ट, २०१८

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या सन २०१८-१९ च्या वार्षिक कृती आराखड्यात मौ. भोरटेक ( ता. मोताळा, जि. बुलडाणा ) नळ पाणी पुरवठा योजनेचा समावेश समावेश करण्यात आलेला आहे. सदर योजनेचे अंदाजपत्रक संदर्भाधीन क्र. १ येथील पत्रान्वये प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा यांनी तांत्रिक मान्यता दिलेली आहे. तसेच मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग यांच्या अध्यक्षतेखालील तांत्रिक समितीच्या दिनांक २३.१०.२०१८ च्या बैठकीत सदर योजनेच्या सविस्तर प्रकल्प अहवालास मंजूरी

दिलेली आहे. त्यामुळे मौ. भोरटेक ( ता. मोताळा, जि. बुलडाणा ) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३६.९१ लाख इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौ. भोरटेक ( ता. मोताळा, जि. बुलडाणा ) येथील ४० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या रू. ४५९७/- इतका दरडोई खर्च असलेल्या नळ पाणीपुरवठा योजनेच्या रू.३६.९१ लाख (अक्षरी रूपये छत्तीस लाख एक्याण्णव हजार फक्त ) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत खालील अटी व शर्तींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर योजनेची अंमलबजावणी जिल्हा परिषद, बुलडाणा यांनी करावी. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर **किमान १ वर्षे योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक** राहील. योजना यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे याची खात्री जिल्हा परिषदेने करावी, तसेच योजनेच्या देखभाल दुरुस्तीसाठी संदर्भाधीन क्र.७ येथील दि.१७ ऑक्टोबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करावा.

II. **योजनेची अंमलबजावणी होऊन कंत्राटदारा मार्फत योजना किमान १ वर्ष चालविण्यात येणार असली तरी ग्रामस्थांकडून या एक वर्षाचीही पाणीपट्टी वसूल करण्यात यावी. वसूल करण्यात आलेली पाणीपट्टी योजना चालविणा-या संस्थेस देण्यात यावी.**

III. योजनेची कामे विहीत पध्दतीने ई- निविदा मागविण्यात येऊन करावीत.

IV. **योजनेसाठी आवश्यक भुसंपादन परवानग्या प्राप्त झाल्याशिवाय योजनेस कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत. सदर अटींची पूर्तता न करताच कार्यारंभ आदेश दिल्यास या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द समजण्यात येईल.**

V. **योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळ जोडण्यांचा व मीटरचा समावेश करण्यात यावा. तसेच किमान ८० % नळजोडणी धारकाकडून स्वखर्चाने मीटर जोडणी घेणेबाबत हमीपत्र घेण्यात यावे व त्याची एक प्रत लॅमिनेट करुन नळ जोडणी धारकास द्यावी व एक प्रत ग्रामपंचायती कडे ठेवण्यात यावी. तद्नंतरच कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.**

VI. **ग्रामसभा ठराव/हमीपत्र दिल्यानंतरही एखाद्या ग्रामस्थाने पाणी घेण्यास नकार दिला तरी त्याच्याकडून किमान ५० टक्के पाणीपट्टी वसूल करण्यात यावी. याबाबत ग्रामस्थांना निविदा प्रक्रियेच्या अगोदरच कल्पना देण्यात यावी व ग्रामसभेचा तसा ठराव घेण्यात यावा.**

VII. **सदर योजनेचा समावेश केंद्र शासनाच्या IMIS या प्रणालीवर करण्यात यावा.**

VIII. योजनेची कामे मंजूर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या टप्या-टप्याने पुर्ण करण्यात यावीत. योजनेचा उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.

IX. योजना चालविणे व देखभाल दुरूस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार घरगुती, बिगर घरगुती व संस्थात्मक नळजोडणी धारकासाठी पाणी पट्टीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी.

X. वसूल करण्यात आलेल्या पाणीपट्टीपैकी २० टक्के पाणीपट्टी ही मोठ्या देखभाल दुरुस्तीकरिता ठेवण्यात यावी. योजनेच्या पाईप्स या उपांगाची देखभाल दुरुस्ती प्रत्येक ५ वर्षांनी व इतर उपांगाची देखभाल दुरुस्ती प्रत्येक ३ वर्षानी करावी.

XI. योजना चालविणे त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

XII. सदर योजनेतील सर्व गावे हागणदारी मुक्त असले तरी ते नेहमीच हागणदारी मुक्त राहतील याबाबत खात्री करावी.

XIII. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून जादा अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

XIV. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

XV. संदर्भाधीन क्र.१० येथील दि.१५ जून, २०१५ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे अनिवार्य राहील.

XVI. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरूवात करावी.

XVII. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिका-याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

XVIII. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

XIX. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा योजनांकरिता विहित केलेली मानके पूर्ण करणे बंधनकारक राहील.

XX. योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर यांची राहील.

२. या योजनेवर होणारा खर्च हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२८१४५६११०९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2019.01.30 10:47:26 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, अमरावती
६) जिल्हाधिकारी, बुलडाणा
७) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, भूजलभवन, शिवाजीनगर, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा
९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई
१०) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, अमरावती
१२) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१३) कार्यासन पापु-०४ व पापु-२० पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती (पापु-१३)